**महाराष्ट्र विकास सेवेमधील सहायक गट विकास अधिकारी, गट-ब (एस-१५) संवर्गातील अधिकारी यांना गट विकास अधिकारी, गट-अ (एस-२०) संवर्गात तदर्थ पदोन्नती देणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२२/प्र.क्र.२२१/२०२२/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ११ मार्च,२०२४

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवेमधील सहायक गट विकास अधिकारी, गट-ब या संवर्गातील (वेतन स्तर एस-१५: ४१८००-१३२३००) श्री.मंगेश कुचेवार यांना गट विकास अधिकारी, गट-अ या संवर्गात (वेतन स्तर एस-२०: ५६१००-१७७५००) तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे .सदर पदोन्नत होणाऱ्या अधिकारी यांना नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.मंगेश आर. कुचेवार, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती,वाई, जि.सातारा | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, शाहुवाडी, जि.कोल्हापूर | रिक्तपदी |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा .सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६ ब यांच्या दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहेत.

३. दिव्यांग अधिकाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-अ यांनी दिनांक २०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनांच्या अधिन राहून सदर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

४. श्री.कुचेवार यांना गट विकास अधिकारी, गट-अ संवर्गात पुढील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

४.१) श्री.कुचेवार यांना देण्यात येणारी गट विकास अधिकारी, गट-अ संवर्गातील तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे .

४.२) सदरची पदोन्नती तदर्थ स्वरूपाची असून सदर पदोन्नती प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात येत आहे.

४.३) या तदर्थ पदोन्नतीमुळे श्री.कुचेवार यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

४.४) श्री.कुचेवार यांना पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या पदावर विहित कालावधीत रूजू होणे आवश्यक आहे .

५. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी गट विकास अधिकारी, गट-अ संवर्गात तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या श्री .कुचेवार यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्याबाबत सुचना द्याव्यात.

६. गट विकास अधिकारी, गट-अ संवर्गातील तदर्थ पदोन्नती दिलेल्या श्री.कुचेवार यांना त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजु व्हावे तसेच सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.संबंधित अधिकारी यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये . त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१११८२२४४४६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.03.11 19:05:31 +05'30'

**( डॉ.उर्मिला जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) विभागीय आयुक्त , पुणे,
६) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर व सातारा,
८) जिल्हा कोषागार अधिकारी ,कोल्हापूर व सातारा,
९) संबंधित अधिकारी (विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत),
१०) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,
११) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग.